**धावजी लक्ष्मण नाईक शिक्षण प्रसारक मंडळ दहेली तांडा,ता.किनवट जि.नांदेड द्वारा संचलित स्व. संगीतदेवी विजाभज माध्यमिक आश्रमशाळेस इयत्ता ८ वी (ब) व इयत्ता ९ वी (ब) च्या अतिरिक्त तुकडीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

शासन निर्णय क्रमांकः विभशा २०१४/१७/प्र.क्र.४४ /विजाभज-२

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना**

धावजी लक्ष्मण नाईक शिक्षण प्रसारक मंडळ दहेली तांडा, ता.किनवट जि.नांदेड या संस्थेमार्फत स्व. संगीतदेवी विजाभज माध्यमिक ही आश्रमशाळा चालविण्यात येते. संचालक, विजाभज यांनी स्थानिक ठिकाणची विजाभज प्रवर्गातील लोकसंख्या या बाबी विचारात घेऊन सस्थेच्या मागणीप्रमाणे इयत्ता ८ वी ( ब ) व इयत्ता ९ (ब) वी चे वर्ग सुरु करण्याची केलेली विनंती विचारात घेऊन सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

धावजी लक्ष्मण नाईक शिक्षण प्रसारक मंडळ दहेली तांडा, ता.किनवट जि.नांदेड या संस्थेमार्फत स्व. संगीतदेवी विजाभज माध्यमिक ही आश्रमशाळा चालविण्यात येते. संचालक, विजाभज यांनी स्थानिक ठिकाणची विजाभज प्रवर्गातील लोकसंख्या, अपु-या असलेल्या शिक्षणाच्या सोयी सुविधा इ. बाबी विचारात घेऊन सस्थेच्या मागणीप्रमाणे इयत्ता ८ वी ( ब ) व इयत्ता ९ ( ब ) अशा दोन अतिरिक्त तुकडयास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. नवीन वर्गवाढीमुळे प्रत्येक वर्गात १.५ प्रमाणे अनुज्ञेय होणा-या शिक्षकांच्या ३ पदावर संस्थेतील, जिल्ह्यातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचा-यांच्या यादीमधून सेवा ज्येष्ठ कर्मचा-यास मागासवर्गीयांचे आरक्षण विचारात घेऊन नियुक्ती देणे बंधनकारक राहील.

२. सदर संस्थेस इयत्ता ८ वी ( ब ) व इयत्ता ९ वी ( ब ) वर्गासाठी अनुज्ञेय असणारे वेतनेत्तर अनुदान व इमारत भाडे देय राहील.

३. इयत्ता ८ वी ( ब ) व इयत्ता ९ वी ( ब ) चे वर्ग सदर संस्थेस जोडून दिल्यास येणारा खर्च सन २०१४-१५ या वर्षात मंजूर असलेल्या तरतुदीतून भागवावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ५४९/ व्यय-१४ दि. २१.०८.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१४०८२८१६३४२२०७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.08.28 19:10:38 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**कार्यसन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे -४११ ००१

२) प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग, लातूर.

३) सहाय्यक आयुक्त समाजकल्याण, नांदेड.

४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा वा लेखा अनुज्ञेयता) नागपूर

५) जिल्हा कोषगार अधिकारी,नांदेड.

६) मा. मंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव

७) अध्यक्ष / सचिव, धावजी लक्ष्मण नाईक शिक्षण प्रसारक मंडळ दहेली तांडा, ता.किनवट जि.नांदेड

८) निवड नस्ती.